**सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्त बांधकाम कामगारांची नोंदणी व नुतनीकरण करण्याची कार्यवाही तसेच बांधकाम आस्थापनाकडून उपकराची वसुली व बांधकाम आस्थापनांची नोंदणी १०० टक्के पूर्ण करणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०१८/प्र.क्र.८४/इमारती-२**
मादाम कामा मार्ग, हूतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ०८ जून, २०१८

**संदर्भ** - शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक बीसीए २००९/प्र.क्र. १०८/कामगार ७-अ, दिनांक १७ जुन २०१०.

**प्रस्तावना :-**

इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार व सेवाशर्ती नियमन) अधिनियम १९९६, इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याण अधिनियम १९९६ हे केंद्र शासनाने इमारत व इतर बांधकाम क्षेत्रात कार्यरत असलेल्या बांधकाम मजूरांना, जे राज्य शासनाने गठित केलेल्या इमारत व इतर बांधकाम कल्याण मंडळात लाभार्थी म्हणून नोंदित झालेले किंवा ज्या कामगारांची लाभार्थी म्हणून नोंदणी करण्यात येणार आहे अशा कामगारांचे कल्याण करण्याच्या उद्देशाने पारीत केलेले आहेत. सदर कायद्याची महाराष्ट्र राज्यात अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कल्याण उपकर नियम २००७ तयार करण्यात आले आहेत. या अधिनियमातील तरतुदीनुसार दिनांक २६/६/१९९७ च्या अधिसूचनेप्रमाणे पाच शासकीय सदस्यांचे मंडळ स्थापन करण्यात आलेले आहे.

संदर्भीय शासन निर्णयातील मुद्दा क्र.४ मध्ये सार्वजनिक बांधकाम, जलसंपदा व वन विभागामार्फत केली जाणारी जी कामे “इमारत व बांधकामाच्या परिभाषेत येतात अशा कामांसाठी इमारत व इतर बांधकामाचे कंत्राट घेणा-या कंत्राटदार/अभिकरण यांच्या देयकातून इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याण उपकर विहित दराने वसूल करण्यात यावा”. सदर जबाबदारी संबंधित विभागाची असेल तसेच जी देयके कोषागारात सादर होतील अशा देयकात संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांने “इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याण उपकर” याची वसुली दर्शवावी व त्यानुसार कोषागाराने सदर वसूली करावी, असे नमुद आहे.

मा. मुख्यमंत्री महोदयांनी राज्यातील बांधकाम कामगारांची नोंदणी व नूतनीकरण करण्याची कार्यवाही, बांधकाम आस्थापनाकडून उपकराची वसूली व बांधकाम आस्थापनांची नोंदणी १०० टक्के पूर्ण होईल याची नोंद घेऊन आतापर्यंत विभाग प्रमुखांनी वर्षनिहाय जमा केलेल्या उपकराची रक्कम, बांधकाम व्यवस्थापनांनी केलेली नोंदणी व एकूण नोंदणीकृत केलेले बांधकाम कामगार व कामगारांना नोंदणी/ नूतणीकरणकरिता देण्यात आलेले ९० दिवसांचे प्रमाणपत्र इत्यादी बाबतच्या माहितीचा आढावा दि.२३/६/२०१६ च्या बैठकीमध्ये घेण्यात आला होता. सदर बैठकीच्या इतिवृत्तामध्ये “महाराष्ट्रातील बांधकाम कामगारांची नोंदणी संख्या वाढण्यासाठी व त्यांना कल्याणकारी योजनांचा लाभ देण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभाग, जलसंपदा विभाग, म्हाडा, सिडको, एम.आय.डी.सी. तसेच बांधकाम क्षेत्राशी त्यांच्या क्षेत्रीय स्तरावरील अधिका-यामार्फत बांधकाम आस्थापनांची नोंदणी करण्यासाठी व बांधकाम कामगारास आवश्यक प्रमाणपत्र देण्यासाठी, संबंधीत नियोक्त्यास निदेश देण्याबाबत संबंधितांना आदेश निर्गमित करावेत”, असे निर्देशित केले आहे.

मा. मुख्यमंत्री महोदयांनी दिलेल्या निर्देशाच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे परिपत्रक निर्गमित करण्यात येत आहे :-

**शासन परिपत्रक-**

महाराष्ट्रातील बांधकाम कामगारांची नोंदणी संख्या वाढवण्यासाठी व त्यांना कल्याणकारी योजनांचा लाभ देण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक बीसीए २००९/प्र.क्र.१०८/कामगार ७-अ, दिनांक १७ जुन २०१० मध्ये नमुद कार्यपध्दतीचे पालन करावे.

२) सर्व आहरण व संवितरण अधिकारी तसेच शासकीय अभिकर्त्यांनी उपकर अधिनियमाच्या कलम ३ आणि केंद्र शासनाच्या इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याण उपकर नियम १९९८ च्या नियम ३ नुसार निर्गमित केलेल्या दि.२६.९.१९९६ च्या अधिसुचनेनुसार १ टक्का उपकराची रक्कम इमारत व बांधकाम कामगार कल्याण मंडळात न चुकता जमा करावी.

३) बांधकाम आस्थापनांची नोंदणी करण्यासाठी व बांधकाम कामगारास आवश्यक प्रमाणपत्र देण्यासाठी, संबंधीत नियोक्त्यास (Employer) निदेश देण्याबाबत आदेश निर्गमित करावेत.

४) बांधकाम कामगारांची नोंदणी व नुतनीकरण करण्याची कार्यवाही, बांधकाम आस्थापनाकडून उपकराची वसुली व बांधकाम आस्थापनांची नोंदणी १०० टक्के पूर्ण होईल याची दक्षता घेण्यात यावी.

५) विभाग प्रमुखांनी वर्षनिहाय जमा केलेल्या उपकराची रक्कम, बांधकाम व्यवस्थापनांनी केलेली नोंदणी व एकुण नोंदणीकृत केलेले बांधकाम कामगार व कामगारांना नोंदणी/नुतणीकरणकरिता देण्यात आलेले ९० दिवसांचे प्रमाणपत्र, इत्यादी माहिती शासनास सादर करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०६०८१३३६२७०५१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sanjay Uttarwar

Digitally signed by Sanjay Uttarwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cab21a54ad660ded981a3eca61380e321e245c3a783fe22e29d3e1080185a683, serialNumber=23844598153e02b0343bb8841e656191857a573661abb05577db911eb5e3ded7, cn=Sanjay Uttarwar
Date: 2018.06.08 13:42:56 +05'30'

**( संजय उत्तरवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सा.ऊ.वगळून) यांचे खाजगी सचिव
४) मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
५) मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव.
६) मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
८) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
१०) निवडनस्ती- इमा-२ कार्यासन.